**कांदळवन (Mangrove) क्षेत्राच्या संरक्षण, संवर्धन व व्यवस्थापनासाठी आवश्यक असणाऱ्या अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या ३७ पदांना मुदतवाढ देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२०/प्र.क्र.९६/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ३० मार्च, २०२०.

**पहा :-**

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग, क्रमांक एस-१०/२०१९/प्र.क्र.१८८/फ-३, दिनांक ८.०३.२०१९ व दिनांक ९.१०.२०१९.
२) या विभागाचे शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक १३.०९.२०१९.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.४८/१९-२०/१७४६; दिनांक १८.०२.२०२०.
४) वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२.०२.२०२०.

**शासन निर्णय :-**

रिट याचिका क्र.३२४६/२००४ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिनांक ६.१०.२००५ रोजी पारित केलेल्या आदेशानुसार कांदळवन (Mangrove) क्षेत्राचे संरक्षण, संवर्धन व व्यवस्थापन करणे आवश्यक आहे. याकरिता क्षेत्रिय पातळीवर पुरेसा कर्मचारी वर्ग उपलब्ध नव्हता. या बाबी विचारात घेऊन शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१०/प्र.क्र.९२/फ-१, दिनांक १ नोव्हेंबर, २०११ अन्वये अधिकारी / कर्मचारी यांची एकूण ३७ अस्थायी पदे निर्माण करण्यात आली.

२. महाराष्ट्रातील ७२० कि.मी. तटीय क्षेत्रातील कांदळवनाचे संरक्षण, संवर्धन व व्यवस्थापन करण्यासाठी सदरची योजनेतर व योजनेखालील ३७ अस्थायी पदे पुढे देखील चालू ठेवणे आवश्यक आहे. सदर ३७ अस्थायी पदे दिनांक २९.०२.२०२० पर्यंत चालू ठेवण्यास शासनाने संदर्भ क्रमांक १ अन्वये यापूर्वी मान्यता दिली होती. सदर ३७ अस्थायी पदांना आता दिनांक २८.०२.२०२१ पर्यंत चालू ठेवण्यासाठी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रस्ताव सादर केला आहे.

३. वित्त विभागाच्या दिनांक १२.०२.२०२० च्या शासन निर्णयानुसार सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या अधिनस्त सर्व अस्थायी पदांना दिनांक ३०.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहे. यास्तव **प्रपत्र-अ** मध्ये दर्शविल्यानुसार सदर ३७ अस्थायी पदे **दिनांक १.०३.२०२० ते दिनांक ३१.०८.२०२० पर्यंत** चालू ठेवण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

अ) सदर ३७ अस्थायी पदे ६ महिन्यांपेक्षा अधिक कालवधीसाठी रिक्त नाहीत.
ब) सदर ३७ अस्थायी पदे वन विभागातील पदांच्या आढाव्याअंती मान्य केलेल्या आकृतीबंधातील २७७९२ पदांमध्ये समाविष्ट असणे आवश्यक आहे.

४. प्रस्तुत प्रकरणी मॅंग्रोव्ह व्यवस्थापन, संरक्षण व संवर्धनासाठी निर्माण करण्यात आलेले पद जेव्हा (Out Sourcing) बाह्य स्त्रोताद्वारे भरले जातील तेव्हा सदर आस्थापनेवरील येणारा मानधनावरील खर्च २४०६ - वनीकरण व वन्यजीवन (२४०६ ७२२३), १०१ (११) वनसंधारण व विकास, (११) (३२) १३ केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशींनुसार वनांचे व्यवस्थापन याकरिता केंद्र सहाय्य (दत्तमत) (२४०६ ७२२३) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. मात्र ज्यावेळी सदर पदे नियमित अधिकारी / कर्मचाऱ्यांमार्फत भरली

जातील त्या वेळी त्यांचे वेतन व भत्ते मुख्य लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) १०१ वनसंरक्षण व विकास (०१) (०१) प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) या लेखाशिर्षा खाली सन २०२०-२१ या वित्तीय वर्षातील मंजूर होणाऱ्या अनूदानातून भागविण्यात यावा.

**५.** हा शासन निर्णय वित्त विभागाचे क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२.०२.२०२० च्या शासन निर्णयास अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३३०१३५५४६३७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sunil Pandurang Pandhare

Digitally signed by Sunil Pandurang Pandhare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f874792415b92ba519384cacb41b53a89cf93dbd96d4be1f7d97fb6326eed47, cn=Sunil Pandurang Pandhare
Date: 2020.03.30 14:00:07 +05'30'

**( सुनिल पांढरे )**
अवर सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, कांदळवन कक्ष, मुंबई.

६) अपर मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.

७) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे / कोल्हापूर.

८) सर्व संबंधित उप वनसंरक्षक.

९) फ-४ / फ-८ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

## प्रपत्र-अ

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | सहा. वनसंरक्षक | १ |
| २ | वनक्षेत्रपाल | ४ |
| ३ | वनक्षेत्र सर्वेक्षक | १ |
| ४ | सर्वेक्षक | २ |
| ५ | वनरक्षक | १२ |
| ६ | लघुलेखक (कनिष्ठ श्रेणी) | १ |
| ७ | मुख्य लेखापाल | १ |
| ८ | लेखापाल | ४ |
| ९ | लिपिक | ५ |
| १० | नौकाचालक | २ |
| ११ | डिंघी चालक | २ |
| १२ | खलाशी | २ |
| एकूण | | ३७ |